**प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालयातून योजनांतर्गत व शासकीय आश्रमशाळा/वसतीगृहांसाठी करण्यात येणा-या वस्तूंच्या खरेदीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:शाआशा-२०१०/ प्र.क्र.४९९/का.१३**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक: २४ सप्टेंबर,२०१०**

**प्रस्तावना**:- शासकीय कार्यालयांसाठी भांडार खरेदीबाबत नियमावली व उद्योग,उर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय, क्रमांक:भांखस-१०८८/(२५१२)/उद्योग-६, दिनांक २/१/१९९२ मधील तरतूदीप्रमाणे विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार सर्व शासकीय कार्यालयातील वस्तूंची खरेदी होणे आवश्यक आहे. प्रकल्प अधिका-यांना खरेदीसाठी रु. २ लक्ष इतकी वित्तीय मर्यादा देण्यात आली आहे. परंतु या मर्यादेचे सर्रासपणे उल्लंघन केले जात असल्याचे तसेच सर्वच प्रकल्प अधिका-यांकडून निविदा प्रक्रिया न अवलंबीता मोठया प्रमाणावर खरेदी केली जात असल्याचे तसेच आवश्यकता नसताना मोठया प्रमाणावर साहित्य खरेदी करुन वाटपाविना ठेवल्याचे विशेष लेखा परिक्षण कार्यवाहीत विभागाच्या निर्देशनास आले आहे. तसेच विभागातील सर्वच प्रकल्प अधिकारी हे खरेदी प्रक्रियेमध्ये गुंतलेले असल्याचे निदर्शनास आले असून त्यामुळे मोठया प्रमाणावर शासकीय निधीची हेळसांड व अफरातफर केली जात असल्याचा संशय निर्माण झाल्याने प्रकल्प अधिका-यांचे खरेदीचे अधिकार स्थगित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक** :- शासकीय कार्यालयांसाठी भांडार खरेदीबाबत नियमावली व उद्योग,उर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय, क्रमांक:भांखस-१०८८/(२५१२)/उद्योग-६, दिनांक २/१/१९९२ मधील तरतूदीप्रमाणे विहीत सर्व शासकीय कार्यालयातील वस्तूंची खरेदी होण्यासाठी आणि मंत्रालयीन स्तरावरुन काही प्रकल्प कार्यालयाच्या करण्यात आलेल्या विशेष लेखा प्रशिक्षणात निदर्शनास आलेल्या अनियंमीतता दूर करण्यासाठी व अशा या बाबीस आळा घालण्यासाठी आणि प्रकल्प अधिकारी यांना योजनांची परिणामकारक अंमलबजावणी करण्यासाठी अधिक वेळ मिळावा, या दृष्टीकोनातून प्रकल्प स्तरावरील सर्व योजनांतर्गत वस्तूंची खरेदी , त्याचप्रमाणे शासकीय आश्रम शाळा व वसतिगृह यांच्यासाठी करावयाच्या अन्नधान्य व इतर वस्तूंच्या स्थानिक खरेदीबाबत खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१) प्रकल्प अधिकारी यांच्या नियंत्रणाखाली राबविण्यात येणा-या सर्व योजनांसंबंधीत वस्तूंच्या खरेदीसाठी प्रकल्प अधिकारी यांना देण्यात आलेले वित्तीय मंजूरीचे

कृ.मा.प.

व खरेदीचे अधिकार पुढील निर्णय होईपर्यंत अपर आयुक्त,आदिवासी विकास यांना देण्यात येत असून **प्रकल्प अधिकारी यांचे अधिकार तात्काळ स्थगित करण्यात येत आहेत.**

२) शासकीय आश्रमशाळा व वसतिगृहासाठी अन्नधान्याचा (आहार) पुरवठा काही कारणामुळे विहीत तारखेपर्यंत होऊ शकला नाही अशा अपवादात्मक परिस्थितीत प्रकल्प अधिकारी यांनी स्थानिक बाजारातून विहीत पध्दतीनुसार मंजूर केलेल्या दरान्वये व लेखा अधिकारी/सहाय्यक लेखा अधिकारी यांच्या सल्ल्याने खरेदीची कार्यवाही करावी. जेणेकरुन मुलांची कोणत्याही प्रकारची गैरसोय होणार नाही. आहार विषयक व इतर वस्तूंच्या खरेदीसाठी प्रकल्प अधिकारी कार्यालय स्तरावरील खरेदी समितीने वस्तूंचे परिमाण निश्चित करुन बैठकीच्या ठरावाची प्रत पुरवठादाराच्या देयकासह अपर आयुक्त कार्यालयास पाठवावी.

३) प्रकल्प अधिकारी यांनी त्यांच्या स्तरावरुन या परिपत्रकाच्या दिनांकापूर्वी दिलेल्या सर्व पुरवठा आदेशांन्वये प्राप्त झालेल्या वस्तूंच्या प्रलंबित देयकांचे प्रदान अपर आयुक्त यांच्या कार्यालयाकडून करण्यात यावे. अशा सर्व प्रलंबित मागण्यांचे प्रदान करण्यापूर्वी अपर आयुक्त कार्यालयाने देयकाची नियमानुसार छाननी करावी.

४) प्रकल्प अधिकारी कार्यालयाकडून व संबंधित पुरवठादाराकडून अपर आयुक्त कार्यालयास प्राप्त होणा-या सर्व प्रकारच्या प्रलंबित देयकांची तपासणी अपर आयुक्त कार्यालयातील सहाय्यक लेखा अधिकारी,महाराष्ट्र राज्य वित्त व लेखा संवर्ग (वर्ग-३) यांनी करावी. सहाय्यक लेखा अधिकारी यांनी अशा सर्व देयकांचे सखोल व तपशिलवार तपासणी व पूर्व लेखापरिक्षण करावे. यासाठी आवश्यक मनुष्यबळ अपर आयुक्त,आदिवासी विकास यांनी उपलब्ध करुन द्यावे. अपर आयुक्त यांनी खर्चास लेखी मंजूरी दिल्यानंतर अपर आयुक्त स्तरावरुनच कोषागारातून रकमा आहरित करुन संबंधीत पुरवठादारास प्रदान करण्यात याव्यात.

५) प्रकल्प अधिकारी यांनी योजनेच्या सर्व वस्तूंची मागणी पात्र लाभार्थ्यांच्या यादीसह अपर आयुक्त कार्यालयास सादर करावी. अपर आयुक्त,आदिवासी विभाग यांनी खरेदीची कार्यवाही शासनाची प्रचलित पध्दत तसेच खरेदीबाबत सर्व शासन निर्णयाप्रमाणे अपर आयुक्त स्तरावरील खरेदी समिती मार्फत करावी. पुरवठा आदेश प्रकल्पनिहाय अपर आयुक्त,आदिवासी विकास यांनी काढावेत. प्रकल्प कार्यालयास वस्तू प्राप्त झाल्यानंतर चलनाची प्रत महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम,१९६५ मधील नियम क्र. १७६ अन्वये प्रकल्प अधिकारी यांच्या स्वाक्षरीचे प्रमाणपत्र नमूद करुन अपर आयुक्त,आदिवासी विकास यांना पाठवावी.

६) अपर आयुक्त कार्यालयास पुरवठादाराचे मुळ देयक प्राप्त झाल्यानंतर जोपर्यंत उपरोक्त परिच्छेद ५ प्रमाणे चलनाची प्रत प्रकल्प अधिकारी कार्यालयाकडून प्राप्त होत नाही, तोपर्यंत अशा देयकांचया मंजूरीचे आदेश अपर आयुक्त कार्यालयाने निर्गमीत करु नयेत.

७) यापुढे योजनांतर्गत वस्तूंच्या व आश्रमशाळा व वसतिगृहासाठी आवश्यक अन्नधान्य व इतर वस्तूंच्या खरेदीच्या देयकांचे प्रदान अपर आयुक्त स्तरावरुन करण्यात येणार असल्यामुळे सध्या प्रकल्प अधिकारी यांच्या कार्यालयास अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली अंतर्गत देण्यात आलेले संबंधीत शिर्षातील अनुदान तात्काळ अपर आयुक्त यांनी काढून घ्यावे.

८) या आदेशातील उपरोक्त सर्व तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे,अन्यथा अनियमितता करण्यात आलेल्या प्रकरणी महाराष्ट्र शासन,क्रमांक: भांखस-२००२ (२९९०)/उद्योग-६, दिनांक ४/४/२००३ मधील परिच्छेद ४ अन्वये आर्थिक गैरव्यवहार समजून संबंधित अधिकारी व कर्मचारी यांच्याविरुध्द महाराष्ट्र शिस्त व अपील नियम,१९७९ अंतर्गत थेट शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

९) उपरोक्त तरतूदींची तात्काळ अंमलबजावणी करावयाची असून आयुक्त, आदिवासी विकास यांनी या परिपत्रकातील तरतूदींचे काटेकोरपणे पालन होत असल्याची खात्री करुन त्यांचा अहवाल दिनांक १५/१०/२०१० पर्यंत सादर करावा.

१०) आयुक्त कार्यालयातील अंतर्गत लेखा परिक्षण पथक व प्रशासकीय निरिक्षण पथकांनी संबंधित प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त कार्यालयांच्या निरिक्षणांच्या वेळी या परिपत्रकातील तरतूदींचे काटेकोरपणे पालन होत असल्याची खात्री करुन तसा उल्लेख त्यांच्या निरिक्षण अहवालात करण्यात दक्षता घ्यावी.

२. सदर शासन परिपत्रक,शासन निर्णय,वित्त विभाग क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम,दिनांक १५ मे,२००९ चे सहपत्र-३ येथील सामान्य प्रशासन विभाग क्रमांक:डीसीएन-१०७५/ओएनएम, दिनांक ९/४/१९७५ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सर्व अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी यांनी या परिपत्रकाची **" लेखी पोच "** आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२ यांना परिपत्रक फॅक्सव्दारे प्राप्त होताच नोंदणीकृत डाकेने ( Registered A.D. ) सादर करावी.

४. हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००९२४१८५४४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ला. रा. गुजर )
अवर सचिव

प्रति,
१) मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,

कृ.मा.प.

२) मा.राज्यमंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव ,
३) प्रधान सचिव,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई,
४) आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक,
५) आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे,
६) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.,नाशिक,
७) अपर आयुक्त,आदिवासी विकास,नागपूर/नाशिक/ठाणे/अमरावती,
८) शिक्षण संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे,
९) शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
११) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
१२) सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१३) सर्व जिल्हा कोषागार/उपकोषागार अधिकारी / सर्व जिल्हाधिकारी,
१४) जिल्हा पुरवठा अधिकारी,नागपूर/नाशिक/ठाणे/अमरावती,
१५) वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-१७)मंत्रालय,मुंबई,
१६) अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई,
१७) मा.प्रधान सचिव (आ.वि.) यांचे स्विय सहाय्यक,
१८) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
१९) संचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई,
२०) सहसचिव / उप सचिव /अवर सचिव / कार्यासन अधिकारी,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई,
२१) कक्ष अधिकारी,का.२(विनियोजन) १३ व १५,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) कक्ष अधिकारी,का.६ व ७,आदिवासी विकास विभाग यांनी कृपया उपरोक्त परिपत्रकाच्या अनुषंगाने अपर आयुक्त,आदिवासी विकास व प्रकलप अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना सूचना देऊन प्रकल्प अधिकारी स्तरावरील संबंधित लेखाशिर्षाचे अनुदान अपर आयुक्त स्तरावर प्राप्त झाले असल्याची खात्री करावी.
२३) लेखा अधिकारी (रोख शाखा),आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
२४) निवड नस्ती (का.१३),आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.